**संचालक, विमानचालन यांना तांत्रिक सहाय्य उपलब्ध करुन देण्यासाठी केंद्र शासनाच्या Air India Engg. Services ला Technical Advisor म्हणून नियुक्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. विचासं-१११९/प्र.क्र.८२/ २८-अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ३२.
दिनांक: ०४ फेब्रुवारी, २०२०.

वाचा : १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.विचासं-१११४/ प्र.क्र.४७/ २८-अ, दि.०६ ऑक्टोबर, २०१५.
२) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.विचासं-१११८/ प्र.क्र.१५१/ २८-अ, दि.२२ ऑगस्ट, २०१९ ( बैठकीचे इतिवृत्त)
३) उपसंचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई यांचे पत्र क्र. डीए/ एडीएम/८९/२०२०, दि.२४ जानेवारी २०२०

**प्रस्तावना :**

राज्यातील अतिमहत्वाच्या व्यक्तींच्या हवाई प्रवासाची जबाबदारी राज्य शासनाच्या अधिनस्त विमानचालन संचालनालयाद्वारे पार पाडली जाते. संचालक, विमानचालन यांच्या कार्यालयाच्या अखत्यारित उद्भवणा-या अनेक तांत्रिक बाबींची शहानिशा या कार्यालयात तांत्रिक तज्ञांचे सहाय्य नसल्याने करता येत नाही. तसेच या कार्यालयामार्फत राबविण्यात येणा-या ई-निविदा प्रक्रिया देखील निविदा दस्तावेज व निविदा प्रक्रियेतील त्रुटींमुळे रद्द कराव्या लागल्या आहेत. यास्तव संचालक, विमानचालन यांना तांत्रिक सहाय्य उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात केंद्र शासनाच्या Air India Engg Sevices Ltd यांना या संस्थेस (Technical Advisor) तांत्रिक सल्लागार म्हणून नेमण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

विमानचालन संचालनालयाच्या कामकाजाशी संबंधित बाबींसंदर्भात निर्णय घेण्यासाठी मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १५/२/२०१८ च्या शासन निर्णयान्वये शक्ती प्रदत्त समिती स्थापन करण्यात आलेली आहे. शक्ती प्रदत्त समितीच्या दिनांक १३/८/२०१९ च्या बैठकीत उपरोक्त प्रस्ताव मान्य करण्याबाबत निर्णय घेण्यात आलेला आहे. सदर निर्णयाच्या अनुषंगाने Air India Engg Sevices Ltd या संस्थेशी करार करण्यास संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात आलेले होते. त्यानुसार दिनांक १४/११/२०१९ रोजी शासनाच्या मान्यतेने करार करण्यात आलेला आहे. सदर कराराच्या अनुषंगाने होणा-या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

२. या बाबतचा होणारा खर्च मागणी क्र.ए-४, “२०७०-इतर प्रशासकीय सेवा (११४) परिवहन साधनांची खरेदी व परिरक्षण (००) (०२) विमान चालन सल्लागार, महाराष्ट्र शासन (अनिवार्य) २०७० ०१५६” या लेखाशिर्षातंर्गत **२७-लहान बांधकामे** या उद्दिष्टाखाली संबंधित आर्थिक वर्षात उपलब्ध अर्थसंकल्प तरतूदीतून भागविण्यात यावा, व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदरहू आदेश विमानचालन संचालनालयाच्या विविध बाबींवर निर्णय घेण्यासाठी मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली कार्यरत असलेल्या शक्ती प्रदत्त समितीच्या दि.१३.०८.२०१९ रोजी झालेल्या बैठकीत घेतलेल्या

निर्णयानुसार तसेच सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय ६/१०/२०१५ नुसार शक्ती प्रदत्त समितीस असणाऱ्या वित्तीय अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२००२०५१०४६०५८१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Digitally signed by M B TASHILDAR
Date: 2020.02.05 10:48:03 +05'30'

**( मो. बा. ताशिलदार )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
२. उप संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. सामान्य प्रशासन विभाग / कार्या.२५, मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती (का-२८अ).